**डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठाच्या सुवर्ण जयंती महोत्सवानिमित्त विविध इमारतींच्या बांधकामासाठी निधी वितरीत करणेबाबत. . .**

**महाराष्ट्र शासन,**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण- २००९/(१७०/०९)-विशि-२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २६ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा :** (१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक बीएमयु-२००९/(१८१/०९)/विशि-२, दिनांक २३ नोव्हेंबर, २००९.
(२) शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.युएनआय/३३३५४/२००८/ औवि / विशि-१/६८८०, दि. १.२.२०१०,

**प्रस्तावना :-** मराठवाड्याच्या विकासाची गती वाढविण्यासाठी या विभागात पायाभूत सुविधा निर्माण करणे, त्यांचा दर्जा वाढविणे तसेच शैक्षणिक विषयक सुविधा निर्माण करणे इ. बाबींना उपयुक्त ठरणाऱ्या योजनांच्या "मराठवाडा विकास कार्यक्रम २००७" या कार्यक्रमास शासनाने मंजूरी दिलेली आहे. सदर "मराठवाडा विकास कार्यक्रम २००७" अंतर्गत डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठाच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त वार्षिक योजना सन २००९-१० मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबादचा विकास या योजनेखाली ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी रु.१२००.०० लक्ष नियतव्यय प्रस्तावीत करण्यात आलेला असून त्यापैकी रु.१६६.६७ लक्ष नियतव्यय लेखानुदानाद्वारे अर्थसंकल्पीय करण्यात आलेला असून रु.१०३३.३३ लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीय व्हावयाचा आहे. वार्षिक योजना सन २००९-१० साठी या विद्यापीठासाठी मराठवाडा विकास कार्यक्रम सन २००७ अन्वये सन २००८-०९ व सन २००९-१० साठी रु. १०००.०० लक्ष तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्यामुळे वार्षिक योजना सन २००९-१० साठी मराठवाडा विकास कार्यक्रमांतर्गत देय असलेली रु. १०००.०० लक्ष आणि एकवेळ केंद्रीय अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत राज्य शासनाच्या एकूण हिश्यापोटी द्यावयाच्या एकूण तरतूदीपैकी रु. २००.०० लक्ष अशी एकूण रु. १२००.०० लक्ष नियतव्यय मंजूर करण्यात आलेला आहे. वार्षिक योजना सन २००९-२०१० साठी या विद्यापीठासाठी लेखानुदानाद्वारे अर्थसंकल्पीय करण्यात आलेली रक्कम रु. १६६.६७ लक्ष एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** प्रस्तावनेमध्ये नमूद केलेल्या "मराठवाडा विकास कार्यक्रम २००७" या कार्यक्रमांतर्गत डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ औरंगाबाद या विद्यापीठाच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त पुढील इमारतीच्या बांधकामासाठी रु. १०३३.३३ लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन देण्याचे प्रस्तावित केले आहे. या शासन निर्णयान्वये सदर बांधकामासाठी रु. १६६.६७ लक्ष (रुपये एक कोटी सहासष्ट लक्ष सदुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

## बांधकामाचे विवरणपत्र

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | मंजूर निधी रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | नॅनो टेक्नॉलॉजी विभाग (उपकरणासाठी) | रु. २१.६७ लक्ष |
| २ | ललित कला विभाग | रु. ४५.०० लक्ष |
| ३ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मृती संग्रहालय | रु. २०.०० लक्ष |
| ४ | Centre for Secular Discourses | रु. ३५.०० लक्ष |
| ५ | विद्यापीठ अतिथीगृह | रु. ४५.०० लक्ष |
| | एकूण. . . | **रु. १६६.६७ लक्ष** |

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. लेखाशिर्ष - २२०२ सर्वसाधारण शिक्षण ०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२ विद्यापीठांना सहाय्य पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००) (१८) डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबादचा विकास (२२०२ ३५३९) ३१ सहाय्यक अनुदाने मागणी क्रमांक डब्ल्यू २.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४- नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय शासनाचे संकेतस्थळ www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणकीय सांकेतांक क्र. २०१००२२६१६००२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(रा. गो. जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३) कुलगुरु, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
४) कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
५) सहसंचालक ( उच्च शिक्षण) औरंगाबाद विभाग, औरंगाबाद,
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ पुणे.
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती (विशि-२)